**ॲड.श्रीमती अरुणा एस.पै,विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

वाशी पोलीस ठाणे येथे दाखल गु.नों.क्र.६७/२०१३ (बिल्डर सुनिलकुमार लाहोरिया खुन प्रकरण) या गुन्ह्याप्रकरणी उद्भवणाऱ्या खटल्यातील मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन कामकाजासाठी.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी २०१५/प्र.क्र.३५/पोल-१०**

२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक

मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २८ नोव्हेंबर,२०१८.

**संदर्भ:-** **१)पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांचे पत्र जा.क्र./O.W.No.६६४/२०१८/ दि.२०/१०/२०१८.**

**२) शासन पत्र, विधि व न्याय विभाग क्र.१२२/२८७७/क्रिमि.जन./१८/अ शाखा, दिनांक १५/११/२०१८.**

**शासन निर्णय:-**

वाशी पोलीस ठाणे येथील गु.नों.क्र.६७/२०१३ (बिल्डर सुनिलकुमार लाहोरिया खुन प्रकरण) या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या खटल्यात मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे न्यायालयीन कामकाज पाहण्याकरीता ॲड.श्रीम.अरुणा एस.पै, विशेष सरकारी अभियोक्ता यांची विधि व न्याय विभागाने उपरोक्त दि.१५/११/२०१८ च्या पत्रान्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती केली आहे. सबब,प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्रीम.अरुणा एस.पै,विशेष सरकारी अभियोक्ता यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

i. प्रत्येक उपस्थितीकरीता फी रुपये १५,०००/-

ii. विचारविनिमय फी रुपये ३,०००/- (Per Conference)

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उप आयुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्रीम.अरुणा एस.पै,विशेष सरकारी अभियोक्ता यांना उपरोक्त फी व्यतिरिक्त अपरिणामकारक सुनावणी फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी वा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.बी-१, "२०५५ पोलीस- (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१), शहर पोलीस आस्थापना (२०५५ ००९७) -२८ व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र - २०१५/ प्र.क्र.२१/ २०१५/ विनियम, दि.२९ जुलै,२०१५ अन्वये, वित्तीय अधिकार नियम नियम पुस्तिका - १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मध्ये नव्याने समावेश केलेल्या अ.क्र.४९ नियम क्र. १६६-अ अन्वये प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१८११३०१५५६०४६७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d,
serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.11.30 16:07:10 +05'30'

**(किशोर शामराव भालेराव)**
उप सचिव (विधि),गृह विभाग,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
   आपणांस विनंती करण्यात येते की, प्रस्तुत प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून ॲड.श्रीम.अरुणा एस.पै यांना अंतिमत: अदा करण्यात आलेल्या फी च्या एकूण रक्कमेची सविस्तर तपशिलवार माहिती शासनास उपलब्ध करुन द्यावी.
२. विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र, नाशिक.
३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-१/२,महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई.
७. विधि व न्याय विभाग,अ शाखा,मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९. ॲड.श्रीमती अरुणा एस.पै, आर/गंगोत्री को.ऑप.हॉ.सोसा.,बिल्डींग क्र.७३, बी विंग, फ्लॅट नं.२०१४, टिळकनगर, चेंबूर,मुंबई.
१०. निवडनस्ती पोल १०.